**प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता सन २०२१-२२ मध्ये अनुसुचित जाती प्रवर्गाकरिता पहिल्या हप्त्याचा (केंद्र हिस्सा + राज्य हिस्सा) रुपये १७९.८६ लाख एवढा निधी कृषि आयुक्तालयास वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रअयो-२०२१/प्र.क्र. २७५/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२०/९-अे, दि. २३ डिसेंबर, २०२०
२. केंद्र शासनाच्या अन्न प्रक्रिया उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे इंग्रजी No:FM-11/60/2021-FME, Dated:22.06.2021 चे पत्र.
३. कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: प्रअयो-२०२१/प्र.क्र.१२०/९-अे, दि. १२ ऑक्टोबर, २०२१
४. नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र.पीएमएफएमई/वित्तीयमान्यता प्रस्ताव २१-२२/३८४१९/२०२१, दि. २४.११.२०२१
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: बीजीटी-२०२२/प्र.क्र.७/अर्थसंकल्प (विघयो), दि. २२ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना :-**

"प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना" ही "एक जिल्हा-एक उत्पादन" या धर्तीवरील केंद्र पुरस्कृत योजना **संदर्भ क्र. १** येथील शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ पासून पुढील पाच वर्षासाठी राज्यामध्ये लागू करण्यात आली आहे. सदर योजनेमध्ये केंद्र शासनाचा हिस्सा ६०% तर राज्य शासनाचा हिस्सा ४०% असा असणार आहे. सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता केंद्र शासनाने **संदर्भ क्र. २** येथील दि. २२.६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये अनुसुचित जाती प्रवर्गासाठी पहिला हप्ता राज्य शासनास वितरीत केला आहे. त्यास अनुलक्षून नोडल अधिकारी (PMFME) तथा संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन) यांच्याकडून **संदर्भ क्र. ४** येथील पत्रान्वये प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता निधी वितरणाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदरहू योजनेंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अनुसुचित जाती प्रवर्गासाठी रु. १७९.८६ लाख इतका निधी (सन २०२०-२१ चा समायोजित करावयाच्या राज्याच्या हिश्याच्या निधीचा अंतर्भाव करुन) **संदर्भ क्र. ५** येथील दि. २२.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने कृषि विभागास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

१. प्रधानमंत्री सुक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजनेची सन २०२१-२२ या कालावधीत राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जाती प्रवर्गाचा पहिल्या हप्त्यापोटी केंद्र हिश्शाचा रु. ९४.१८ लाख निधी व त्यास समरुप राज्य हिश्शाचा रु. ६२.७९ लाख निधी व सन २०२०-२१ मधील समायोजित करावयाची रक्कम रु. २२.८९ लाख असा एकूण रु. १७९.८६ लाख (रुपये एक कोटी एकोणऐंशी लाख श्याऐंशी हजार फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखालील बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२६) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (केंद्र हिस्सा ६०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३७५) | मागणी क्र. एन-०३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>०१- अनुसूचित जाती घटकांतर्गत योजना<br>(०१)(२७) प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (राज्य हिस्सा ४०%)<br>३३ अर्थसहाय्य (२४०१ B३८४) |

३. सदर रक्कमेचे कोषागारातून आंहरण व संवितरण करण्याकरिता सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून नोडल एजन्सी, प्रधानमंत्री सूक्ष्म अन्न प्रक्रिया उद्योग योजना (PMFME) तथा आयुक्त (कृषी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हा स्तरावर कोषागारातून आंहरण व संवितरण करण्यासाठी जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिकन्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविणेबाबत दक्षता घ्यावी.

६. विभागप्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन त्यानुसार या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यातील सर्व जिल्ह्यात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM), राज्यस्तरीय तांत्रिक संस्था (SLTI) व इतर यंत्रणांकरिता जिल्हा स्तरावर अवलंबावयाच्या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दतीबाबतच्या सूचना निर्गमित करण्याकरिता नोडल अधिकारी (पीएमएफएमई) तथा संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

९. प्रस्तुत आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ व दि. १४ जानेवारी, २०२२ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीजीटी-२०२२/प्र.क्र.७/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२५११३९२३४८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2022.03.02 11:49:01 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंई ४०० ०३२.
३) मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
६) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

१०) अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

११) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

१२) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.

१३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१४) संचालक (कृषी प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१५) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.

१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.

१७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

१८) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,

१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

२०) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई

२१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.

२२) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.

२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.

२४) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२५) निवड नस्ती/९-अे.